शासनमान्य अशासकीय अनुदानित कला संस्थातील शिक्षक व शिक्षकेतर कर्मचा-यांना तसेच निवृत्ती वेतन धारकांना पाचव्या वेतन आयोगानुसार दि.१.१.१९९६ ते दिं.३१.३.२००४पर्यंतची वेतन व भत्यांची थकबाकी मंजुर करण्याबाबत

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग,**
**शासन निर्णय क्र. : - एडीआर २०१०/१५/१०/तांशि-६,**
**मंत्रालय विस्तार भवन, मुंबई - ४०० ०३२.**
**दिनांक :- ३० जुलै २०१०**

वाचा:-१) शासन अधिसूचना विवि क्र.वेपूर-१२९८/प्र.क्र.१३/९८/सेवा-१० , दि. १०/१२/१९९८
२) एईडी-१४०४/१२७१६(१०) तांशि-४, दि.५/६/२००४
३) उच्च न्यायालय याचिका क्र.१५३/२००२ दि.३/२/२००५ व ६/५/२००५
४) उच्च न्यायालय रिट याचिका क्र.४२०/२००२ दि.२१/२/२२०५
५) सर्वोच्च न्यायालय नवी दिल्ली विशेष अनुमती याचिका क्र.१२७८९/०५,दि.९/११/२००९
६) उच्च न्यायालय अवमान याचिका क्र.१५८/२००४ दि.१५/१/२०१०

प्रस्तावना :- राज्य शासकीय कर्मचा-याप्रमाणेच कला संचालनालयातील शासन मान्य अशासकीय अनुदानित कला संस्थातील शिक्षक व शिक्षकेतर कर्मचा-यांना पाचव्या वेतन आयोगानुसार वेतनश्रेणी व भत्ते लागू करण्याचा प्रश्न शासनाच्या विचाराधीन होता. तथापी राज्याची तत्कालीन आर्थिक परिस्थिती विचारात घेता शिक्षक व शिक्षकेतर कर्मचा-यांना पाचव्या वेतन आयोगानुसार सुधारित वेतनश्रेणी दि. १/४/२००४ पासून लागू करण्याचा निर्णय दि.१२/५/२००४ च्या मंत्रीमडळ बैठकीमध्ये घेण्यात आला व त्यानुसार दि.५/६/२००४ अन्वये आदेश निर्गमित करण्यात आले. सदर निर्णया विरूध्द् श्री.सुरेन्द्र जगताप व इतर यांनी मा.उच्च न्यायालयात ४२०/२००२ अन्वये पाचव्या वेतन आयोगाची वेतन श्रेणी दि.१/१/१९९६ पासून लागू करण्याबाबत याचिका दाखल केली होती. त्या संदर्भात दि. २१/२/२००५ रोजी निर्णय होऊन याचिका क्र.१५३/२००२ संदर्भात मा.उच्च न्यायालयाने पुर्वी दिलेले आदेश कायम असल्याबाबत निर्णय दिला. शासनाने या संदर्भात मा. सर्वोच्च न्यायालयात विशेष अनूमती याचिका (S.L.P.) दाखल केली होती. मा.सर्वोच्च न्यायालयाने एस.एल.पी.खारीज करुन उच्च न्यायालय मुंबई यांनी दिलेले निर्णय कायम ठेवले. दरम्यान याचिका क्र.४२०/२००२ वरील निकालाची अंमलबजावणी न केल्यामुळे श्री.सुरेन्द्र जगताप व इतर यांनी मुंबई उच्च न्यायालयात अवमान याचिका क्र.१५८/२००४ दाखल केली.

सदर याचिकेवर दि.१५/१/२०१०रोजी निर्णय होऊन निर्णयाच्या अनुषंगाने कला संचालनालयातील १९ कला संस्थातील शिक्षक व शिक्षकेतर कर्मचा-यांना पाचव्या वेतन

आयोगाच्या शिफारशीनुसार दि.१/१/१९९६ ते दि.३१.३.२००४ पर्यंतची वेतन व भत्यांची थकबाकी तसेच सेवानिवृत्त कर्मचा-यांना निवृत्तीवेतनाची थकबाकी देण्याचा प्रश्न शासनाच्या विचाराधीन होता. त्या संदर्भात शासन पुढीलप्रमाणे आदेश देत आहे.

**शासन निर्णय :-** कला संचालनालयाच्या अखत्यारीतील मान्यताप्राप्त अशासकीय अनुदानित १९ कला संस्थातील शिक्षक व शिक्षकेतर कर्मचा-यांना संदर्भाधिन अनु. क्र.६ येथे नमुद करण्यात आलेल्या मा.उच्च न्यायालयाच्या आदेशानुसार ५ व्या वेतन आयोगानुसार अनुज्ञेय असलेली दि.१.१.१९९६ ते ३१.३.२००४ या कालावधीतील वेतन व भत्त्यांची तसेच इतर अनुषंगिक बाबीची थकबाकी प्रदान करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे. संबधित कर्मचा-यांना पाचव्या वेतन आयोगानुसार वेतन निश्चितीचे सर्व लाभ अनुज्ञेय राहतील. सदर रक्कम खर्ची घालण्यासाठी कला संचालक हे नियंत्रक अधिकारी असतील.

उच्च व तंत्र शिक्षण विभागाच्या शासन निर्णय क्र.एडीआर-१०९३/१३२/(२९)साशि-५, दि.१६/११/१९९६ अन्वये राज्यातील मान्यताप्राप्त अशासकीय अनुदानित कला संस्थातील शिक्षक व शिक्षकेतर कर्मचा-यांना निवृत्तीवेतनाची योजना लागू करण्यात आली आहे. त्यामुळे या कर्मचा-यांना शासकीय कर्मचा-यांप्रमाणेच भविष्य निर्वाह निधी नियमावली लागू करण्याचे प्रस्तावित आहे. सबब या संस्थातील कार्यरत कर्मचा-यांना पाचव्या वेतन आयोगाच्या सुधारीत वेतन श्रेणी लागु करतांना त्यांची दि.१/१/१९९६ ते दि. ३०/९/१९९८ पर्यंत थकबाकीची रक्कम भविष्य निर्वाह निधीत जमा करण्यात येईल व दि.१/१०/१९९८ पासूनची थकबाकी रोखीने देण्यात येईल. दि.१/१/१९९६ ते दि.११/३/२००४ या कालावधीत सेवानिवृत्त झालेल्या कर्मचा-यांना उपरोक्त कालावधीची थकबाकी रोखीने अदा करण्यात येईल.

सदरचा खर्च "मागणी क्र.डब्ल्यू -४" कला व संस्कृती, १०१- ललीत कला शिक्षण. (०३)(०१) अशासकीय कला संस्थांना सहाय्य, योजनेत्तर योजना, सर्व सामान्य अनुदाने (२२०५-००५५) ३५-सहाय्यक अनुदाने (वेतन) या शिर्षाखाली असलेल्या तरतुदींमधुन भागविण्यात यावा.

सदर आदेश वित्त विभागाच्या सहमतीने त्यांच्या अनौपचारीक संदर्भ क्र-३२४/सेवा-९, दि. १९.४.२०१० व अनौपचारीक संदर्भ क्रमांक ४४८/सेवा-९, दि.७/७/२०१० अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

हा शासन निर्णय शासनाचे www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असुन त्याचा संगणकीय सांकेतांक क्र. २०१००७३०७१९११५८००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने.

(र.रा.दोरसटवार)
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रति,

१. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.

२. महालेखापाल, महाराष्ट्र (लेखा व अनुज्ञेयता) (लेखा परीक्षा), मुंबई / नागपूर
३. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
४. मा. मंत्री, तंत्र शिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. मा.राज्यमंत्री, उच्च व तंत्र शिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. सचिव, उच्च व तंत्र शिक्षण यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई. ३२.
७. कला संचालक, कला संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
८. निरीक्षक, निरीक्षक चित्रकला व शिल्प, महाराष्ट्र राज्य , मुंबई
९. वित्त विभाग (सेवा -९) व (व्यय -५), मंत्रालय, मुंबई -३२.
१०.शासनमान्य अशासकीय अनुदानित कला संस्था (१९)
११. निवड नस्ती (तांशि -६)